**दिव्यांग व्यक्तींना संगणकीय प्रणालीद्वारे ऑनलाईन दिव्यांग प्रमाणपत्र व वैश्विक ओळखपत्र (UDID) देण्यासाठी जिल्हा प्रशासनामार्फत विशेष मोहीम या कार्यक्रमास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: दिव्यांग २०२१/प्र.क्र.४५/दि.क. २**
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०८ मार्च, २०२३.

परिपत्रक

संदर्भ - १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.दिव्यांग- २०२१/प्र.क्र.४५/दि.क.२, दि.०२ डिसेंबर,२०२१.
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन परिपत्रक क्र.दिव्यांग-२०२१/प्र.क्र.४५/दि.क.२, दि.३१ मार्च, २०२२.

दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या प्रकरण १० मधील कलम ५६, ५७, ५८ अनुसार धोरणात्मक निर्णयाची प्रत्यक्षात अंमलबजावणी करण्यासाठी तसेच सर्व २१ प्रकारच्या दिव्यांग व्यक्तींना मुख्यप्रवाहात टिकवून ठेवण्यासाठी दिव्यांग व्यक्तींना दिव्यांगत्व प्रमाणपत्र देणे बंधनकारक आहे. तसेच केंद्र शासनाच्या दि.२२ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये वैश्विक ओळखपत्र प्रणालीअंतर्गत १०० टक्के दिव्यांग व्यक्तींची नोंदणी करण्याचे ध्येय केंद्र शासनाकडून निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार राज्यातील सर्व जिल्ह्यात २१ प्रवर्गातील दिव्यांग व्यक्तींचे तज्ञ डॉक्टरांमार्फत दिव्यांगत्व तपासणी, निदान करून दि.०२ डिसेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये संगणकीय प्रणालीद्वारे ऑनलाईन दिव्यांग प्रमाणपत्र आणि वैश्विक ओळखपत्र (UDID Card) देण्यासाठी दि.१२ डिसेंबर, २०२१ ते दि.१२ मार्च, २०२२ पर्यंत विशेष मोहिम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला होता.

२. दिव्यांगांसाठी वैश्विक ओळखपत्र दिव्यांग व्यक्तींची नोंदणी करण्याचे ध्येय विचारात घेऊन शासन निर्णय दि.०२. डिसेंबर, २०२२ अंतर्गत देण्यात आलेल्या विशेष मोहिमेस विभागाच्या दि.३१ मार्च, २०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये दि.१३ मार्च, २०२२ ते दि.३० जून, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

३. तथापि कोविड-१९ महामारीच्या कालावधीत सदर मोहिमेची प्रभावी अंमलबजावणी होऊ शकली नाही. तसेच दिव्यांग कल्याण, आयुक्तालय, पुणे यांनी दिलेल्या माहितीनुसार एकुण ८३८२१० एवढी युडीआयडी कार्ड वितरीत करण्यात आले असून एकूण प्राप्त अर्जाच्या ६४.४८ टक्के ध्येय निश्चित झाले आहे.

४. दिव्यांग व्यक्तींना दिव्यांगत्व प्रमाणपत्र वितरण करण्याच्या प्रक्रियेस गतिमानता येण्यास व केंद्र शासनामार्फत ठरवून दिलेले ध्येय गाठण्यास व महाराष्ट्र राज्याची कामगिरी उंचावण्यास मदत करण्याकरीता उक्त विशेष मोहिमेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

५. सबब, दिव्यांग व्यक्तींना दिव्यांगत्व प्रमाणपत्र वितरण करण्याच्या प्रक्रियेस गतिमानता येण्यास व केंद्र शासनामार्फत ठरवून दिलेले १००% ध्येय गाठण्यास तसेच महाराष्ट्र राज्याची कामगिरी उंचावण्यास मदत करण्याकरीता दिव्यांग प्रमाणपत्र व वैश्विक ओळखपत्र (UDID) देण्याच्या विशेष मोहिमेस पुढील दि.३० जून, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. वैश्विक ओळखपत्र (UDID) देण्याची कार्यवाही दि. ०२ डिसेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार करण्यात यावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०९१४२९३८६९३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2023.03.09 14:34:20 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा / विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अ. मु. स./प्र. स./सचिव, सर्व मंत्रालय विभाग, मुंबई.
७. आयुक्त, दिव्यांग कल्याण, आयुक्तालय, पुणे.
८. सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय.
९. सर्व आयुक्त, महानगरपालिका.
१०. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग.
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२. सर्व समाज कल्याण, अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. समितीचे संबंधीत सर्व सदस्य ( दिव्यांग कल्याण आयुक्तालयामार्फत)
१४. निवड नस्ती/ दिव्यांग कल्याण-२.